# परिचय



श्री. जयकृष्णपंत हे कवि या नात्याने सर्वांच्या चांगले परिचयाचे आहेत. यापूर्वी त्यांचे 'श्रीलोकमान्यचरितामृत' हे दीर्घकाव्य प्रसिद्ध होऊन, ते लोकादरास पात्र झाले असल्यामुळें, त्यांच्या कवित्वशक्तीची ओळख नव्याने करून देण्याची अवश्यकता नाही. परंतु हे दीर्घ काव्य म्हणजे एका थोर पुरुषाचे चरित्र असून, त्याचा विषय शेवटपर्यंत एकच एक आहे. प्रस्तुत 'पोपटपंचींत' त्यांची विविधविषयांवरील भावगीते एकत्रित केलेलीं आहेत. दीर्घकाव्य आणि भावगीत यांत अंतर्बाह्य फरक असल्यामुळे, प्रस्तुत संग्रहाचा निराळा अल्प परिचय करून देणे जरूरीचें आहे.

खरी कविता भावनेतून उमळते व नंतरहि ती बव्हंशीं भावनेवरच आधारलेली असते. खऱ्या कवींचे अंतःकरण त्याच्या काव्यांतून, विशेषतः भावगीतांतून उत्तम प्रतीत होते: कारण भावगीत लिहितांना कवीची वृत्ति अंतर्मुख झालेली असते व त्यामुळे त्याच्या आत्मीयतेची खरीं खरी काव्यात्म चित्रे त्याच्या भावगीतांतच अधिक स्पष्टपणे उमटलेली असतात. शिवाय इतर आनुषंगिक गुणांबरोबर भावगीतांत साठविलेले मानव्य, त्यांच्या लघुतेमुळें अधिक तीव्रतेनें पटतें. असल्या निकषांवर कवितासुवर्ण घासून पाहिलें असतां त्याची खरी पारख होते. श्री. उपाध्ये यांचीं भावगीतं या दृष्टीने बरीच सरस ठरतील असे वाटते.

श्री. उपाध्ये यांच्या भावगीतांचे स्थूलमानाने चार भाग करितां येतील. पहिला धार्मिक अर्थात् तात्त्विक, दुसरा प्रेमविष-

यक, तिसरा राष्ट्रीय व चवथा विनोदी. यापैकी दुसरा जो प्रे
विषयक भाग आहे, त्यांत खुद्द कवींनीं ' प्रेम ' हा शब्द व्याप
अर्थानें वापरल्यामुळे, मीहि त्यांत पतिपत्नीप्रेम-वात्सल्या
निरनिराळ्या भावनांच्या गीतांचा समावेश केला आहे. श्र
उपाध्ये यांची काव्यवृत्ति धर्मप्रवण असून तिचा लय परमेश्वर
कडे लागलेला आहे. त्यांच्या गीतांमधून हा सूर प्रामुख्य
निघतो आणि त्यामुळे त्यांच्या आरंभीच्या ' प्रणाम ' या गीत
भावनोत्कटता व सहजता दृष्टीस पडते. परमेश्वराची व्या
केवढी मोठी आहे याची मानवी मनास कल्पना करवणार नाह
परंतु कवि आपल्या श्रद्धामय अंतःकरणानें तिचे विस्तृत स्वरू
कसे रंगवतो, हें आपणांस ' ईशव्याप्ति ' या कवितेत दिस
येईल. कवीची वृत्ति जशी धर्मप्रवण आहे तशीच ती हिंदूसंस्क
रांचीहि पण अभिमानी आहे. आधुनिक कवितेला पाश्चात्य संस
तीपासून स्फूर्ति मिळालेली आहे असे आपण अनेक ठिका
पाहतो. परंतु श्री. उपाध्ये यांची कविता जुन्या वाङ्मयाच
अध्ययनानें व उदात्त हिंदु धार्मिक संस्कारानें स्फुरलेली आ
आणि हेच त्यांच्या कवितेचे वैशिष्टय आहे. याच कारणामु
त्यांची राष्ट्रीय कविता किंवा प्रेमविषयक कविताहि स्वाभिमान
शुद्धता यांनीं युक्त आहे. इतकेंच नव्हे तर ' श्रीरामराज्य
भिषेक ' व ' गीतराघव ' या प्रकरणांवरून त्यांच्या कविते
अभियुक्त स्वरूपहि प्रतीत होते. त्यांच्या प्रेमविषयक कवितांमध
आपणाला शुद्ध भक्तीचें सरळ व नैसर्गिक स्वरूप पहावयास मिळ
' प्रेमगीत म्हणजे पतिपत्नींच्या सात्विक भावनांचे गीत '
कल्पना देखील थोडी संकुचितच आहे असें म्हटलें पाहिजे. कार
मानवी हृदय जेव्हां प्रेमाच्या परमनिर्मळ पायरीवर अधिष्ठि

भक्ताच्या भावनेइतकीच वरच्या दर्जाची असूं शकते, आ
म्हणूनच ज्यावेळीं आपण एकादें उदात्त प्रेमगीत वाचतो, त्यावे
त्यांतील भावना आपण आपल्या अंत:करणांतील अभिप्रेत भाव
नेशीं ताडून, कल्पनेने ती ती मूर्ति सगुणस्वरूपांत चित्तचक्षूंपु
उभी करतो व त्या गीतांतील काव्यात्मतेचा आस्वाद घेतो
श्री. उपाध्ये यांची ' दर्शनोत्कंठा, ' ' चित्तचोर, ' ' समर्पण,
' प्रेमबाण, ' ' विराणी ' ही प्रेमगीतें या दृष्टीनें उत्कृष्ट आहे
यांतच अंतर्भाव होणारा दुसरा गीतप्रकार म्हणजे वत्सलगीते
होय. या सदरात ' चिमणा श्रीकृष्ण, ' ' बाळ, ' ' आई आ
बाळ, ' ' आनंद आला आनंद ! ' वगैरेचा समावेश होत अस
त्यांतील ' बाळ ' हे भावगीत प्रत्येक सहृदय आईच्या अंतःक
णाला वत्सलतेची साक्ष पटविणारे आहे. श्री. उपाध्ये यांना मुल
विषयी तर वात्सल्य वाटतेच वाटते, परंतु त्याना मुलाच्या भा
नांशी समरस होता येऊन वत्सलतेने आईशीहि बोलता ये
' आई आणि बाळ ' या कवितेतील विनोदी भावना हृदयात गो
वत्सलताच निर्माण करते. याखेरीज आणखी एका कवितेत कवी
खरे खरे वत्सलहृदय प्रस्फुट झालेले आहे; आणि कवीची वृत्ति बा
लीलांकडे खेचून नेण्यास, हीच कविता किंवा याच कवितेस घ
लेला करुण प्रसंग कारणीभूत झाला की काय, अशी शंका मन
उत्पन्न झाल्याखेरीज राहत नाही. कवीचे अंतःकरण जेव्हां उत्क
भावनेने हेलावते, त्यावेळी ती भावना जरी वैयक्तिक सुखदु:ख
उद्भवलेली असली, तरी ती आपले अनुभव रेखाटतांना लौकि
पातळीवरूनच ते कार्य करीत असते व त्यामुळेच ' लीले 'च
लीला वाचतांना प्रत्येक सहृदय पित्याला आपल्या गतापत्या
स्मृति होऊन त्याच्या डोळ्यांस पाणी आल्याखेरीज राहणार नाही
'लीले' या कवितेत कवीचे पितृवात्सल्य फार उत्कट पण सहजते
उतरलें आहे.

आधुनिक कवितेत ज्या स्वरूपाच्या राष्ट्रीय ( ऐतिहासिक ) कवितेची हल्लीं पैदास होत आहे, तसलें स्वरूप श्री. उपाध्ये यांच्या राष्ट्रीय कवितेनें धारण केलेलें नाहीं, ही समाधानाची गोष्ट आहे. अंतःकरणांतील देशाभिमान किंवा धर्माभिमान ज्वलत्-स्वरूपाचा असल्याखेरीज खरी तळमळ वाटत नाहीं आणि खरी तळमळ वाटल्याखेरीज खरी राष्ट्रीय कविता निर्माण होत नाहीं. श्री. उपाध्ये यांच्या लेखणीनें 'स्वतंत्र हिंदुस्थान,' 'भारत-भाग्योदय' 'तरुण भारतास,' 'हिंदुसंघटन' 'गीतेची आरती' वगैरे स्फूर्तिप्रद गीतें लिहिली आहेत व नवीन पिढीनें जोमदार, स्वाभिमानी व आशावादी व्हावें असा त्यांचा संदेश आहे.

श्री. उपाध्ये यांच्या विनोदी कविता थोड्या आहेत; पण त्यांनींच लोकांचें लक्ष विशेष वेधल्यामुळें त्यांच्या गंभीर कवितां-कडे रसिकांची दृष्टि वळूं इच्छित नाहीं, ही शोचनीय स्थिति आहे. श्री. उपाध्ये यांची विनोदी कविता उपरोधात्मक असल्यामुळें तिच्यांतून हास्य व बोध साहजिकच उद्भवतात. या प्रांतांतील कवितांत 'बावळट बाळू'चें चित्र लहान मुलांनीं वाचण्यासारखें असून, 'ढे' कवितेंतील श्लेषार्थानें येणारा बोध कवींनीं घेण्या-सारखा आहे. त्यांच्या गंभीर शृंगारपर कवितांतूनहि त्यांच्या अंतःकरणाची ही तार अत्यंत नर्मनाजुकतेनें हललेली मधून मधून दृग्गोचर होते.

याखेरीज गीतराघवांतील गीतें, द्रौपदीचा धावा वगैरे कविता स्त्रियांना नित्य म्हणण्यासारख्या अभियुक्त स्वरूपाच्या वठल्या आहेत. श्री. उपाध्ये यांच्यांतील दोष म्हणजे कांहीं कविता प्रमाणाबाहेर लांब आहेत हा एक, व कांहीं कविता निव्वळ तत्व-विवेचक आहेत हा दुसरा. कवितेला उत्कृष्ट शिल्पाची जोड देणें

यांतच कवीची खरी कला असते. परंतु अशा त्यांच्या कांहीं कविता सोडल्या तर त्यांच्या कवितेचें बाह्यांग एकंदीरत उत्तम सजविलेलें असतें. त्यांची भाषा सफाईदार, सरळ, हृदयस्पर्शी व प्रसादपूर्ण असते. त्यांच्या ओव्यांवर एकनाथ व रामदास यांची छाया पडलेली दिसते व त्यामुळें त्या ओव्यांना एकप्रकारचें गंभीर पण सडेतोड-पणाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. त्यांची भाषा अभ्यस्त लेखणींतून निघालेली आहे व तिला अंतःश्चक्षूंच्या द्वारें पूर्व वाङ्मयांतील अनेक मनोहर संकेतप्रासाद व वेदांतमंदिरे दिसतात हे स्पष्ट दिसतें. प्रतीकात्मक कविता कशी असते हें त्यांच्या ‘ विराणी ’ कविते-वरून चांगले दिसतें व ती तुकारामाच्या विराण्यांची छटा दर्श-विते. श्री. उपाध्ये यांनी भावगीतांच्या रूपानें केलेली ही मराठी भाषेची सेवा अभिनंदनीय असून ती रसिकांसहि आनंद दिल्या-खेरीज राहणार नाहीं असे वाटतें.

३० जुलै १९२९ }
पुणें शहर. }

गिरीश



# आभार

व

# कवीचा अल्पसा परिचय.

आमच्या विनंतीस मान देऊन प्रो. श्री. नि. चाफेकर व श्रीयुत कवि 'गिरीश' यांनी अनुक्रमें प्रस्तावना व परिचय लिहून दिल्याबद्दल आम्ही त्या उभयतांचे फार आभारी आहोत.

श्री. उपाध्ये यांचा जन्म इ. स. १८८३ त नागपुर येथें झाला. त्यांचे बालपण व शिक्षणही तेथेंच झाले. अगदीं तरुण वयांत त्यांनीं एकांतांत तीन वर्षेपर्यंत श्रीरामनामाचें पुरश्चरण केलें व त्याच अवधींत प्राचीन मराठी वाङ्मयाचा अभ्यास केला. प्राचीन मराठी वाङ्मयाचा त्यांच्या वृत्तीवर झालेला परिणाम त्यांनी १९२४ सालीं प्रसिद्ध केलेल्या 'श्रीलोकमान्यचरितामृत' या ओवीबद्ध ग्रंथावरून स्पष्ट दिसून येतो. त्यांना कविता करण्याचा नाद त्यांच्या वयाच्या सोळाव्या वर्षापासून असल्याचें कळतें.

प्रकाशक—वि. ग. ताम्हणकर.
मॅनेजिंग डायरेक्टर
महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊस, लि. पुणें.

# अनुक्रमणिका

# अंतर्धान

## कै. सौ. मनोरमाबाई उपाध्ये.



एकपणें विचरलों विहरलों परिहसलों धुसफुसलों
प्रेम–संगमीं स्वैर पोहलों परस्परीं समरसलों.
परि तें अंतर्धान पावलें स्वप्नापरि सुख ठरलें
आतां त्या स्मरणांतचि केवळ सौख्य मानणें उरलें

# पोपटपंची

## प्रणाम.

चाल—हे प्रभो विभो.

हे जगद्गुरो ! प्रणाम तव पदकमला
तव भक्ति मला दे विमला । ध्रु०

द्यावया ज्ञान जीवाला
त्वां सृष्टि घातली शाला
भू तेज पवन घनमाला
हा शिक्षकगण नेमियला । प्रणाम.

सुखदुःखवर्गि घालूनी
प्रेमें कधिं कधिं ताडूनी
हे जीव करुनिया ज्ञानी
निजपदीं नेशि त्या सकलां । प्रणाम.

## ईशव्याप्ति.

चाल—नृपममता.

हे सकल चराचर सदया
व्यापलेंसि तूं प्रभुराया । श्रीहरी
सौंदर्य दिसतसे जे जें
तें तुझ्याच योगें साजे । श्रीहरी
पंकजें उमलती मिटती
ती तुझी स्थितीलयरीती । श्रीहरी
हें कोकिलकंठीं गान
गातसे तुझ्याविण कोण । श्रीहरी
विश्वांत दिसे जें प्रेम
प्रभु ! तूंच तयाचा उगम । श्रीहरी
हीं फुलें, तरूंचीं मुलें,
बघुनि मन भुले, सुखविती वृत्ति,
ती तुझीच सदया ! व्याप्ति । श्रीहरी
करि इंदु अंबरीं लास्य
तें तुझेंच मंगल हास्य । श्रीहरी
तें हास्य झेलि जंव गगन
हर्षाश्रु जाहले भगण । श्रीहरी
नभ तव हें क्रीडाकुंज
खेळणिं हा तारापुंज । श्रीहरी
स्वर्गंगा गुंफिसि हार
प्रभु ! तूंच तुझ्यासम चतुर । श्रीहरी

— पोपटपंची

व्यापला, विश्वि एकला,

कसा, ही कला, तुझ्याविण कोणी

जाणिली नसे मुळिं भुवनीं। श्रीहरी

जें प्रेमळ सुंदर मधुर

बीभत्स भयानक घोर । श्रीहरी

जें उदात्त उज्ज्वल शांत

जे क्रूर परम विक्रांत । श्रीहरी

जे प्रेम जीवगण पाळी

तो काळ जगा जा जाळी । श्रीहरी

जें असे, जें न वा दिसे,

ज्यांत मन हसे, रडे वा ज्यांत

सर्वात तूंच बा! व्याप्त । श्रीहरी

हे गुलाब कुसुमहि तूंच

कंटकही रूप तुझेंच । श्रीहरी

तूं चंदन सौरभ-शाली

तूंच अही त्याच्याखाली । श्रीहरी

सर्वत्र यापरी भरला

पटतसे सर्व हें मतिला । श्रीहरी

परि हरी, सगुण साजिरी,

मूर्ति गोजिरी, दावि मज डोळां

तो खरा सौख्यसोहोळा । श्रीहरी

---

पोपटपंची —

## दर्शनोत्कंठा.

चाल—चंद्र चवथिचा.

हृदय–मोहना ! । अजुनि किती अंत बघसि देसि यातना
दृष्टि आतुरा । एकवार दावि तुझी मूर्ति सुंदरा !
करिं करी त्वरा । उडुं पाहे प्राणहंस होइ घाबरा
तुजविणे कुणा । सांगु तरी अंतरिंच्या सांग भावना ?
दोशि शीण कां । हृदयभाव काय तुला नाहिं ठावुका ?
हृदय तळमळे । काय चुके भेटसी न तूं कशामुळें ?
काय मी करूं । तुजसाठी कवणाचे चरण तरि धरूं
तूंच हे असे । प्रथम लाविलेंस मला आपुलें पिसे
चित्त चोरुनी । चित्र आपुलें दिलेंस तेथ कोरुनी
तरिहि तें झुरे । सगुण–दर्शनास भुकें होत घाबरें
निकट असुनिया । लपंडाव खेळसि हा सांग कासया
जीवितेश्वरा ! । नयन पिसे मार्ग तुझा बघति भिरभिरा
पाहुं दे दिठीं । रूप एकवार कंठि घालुं दे मिठी
जिव मग सुखें । राहूं दे जाऊं दे दोन्हि सारखें

---

— पोपटपंची

## चित्तचोर.

चाल—भैरवी-गजल.

येतो निघूनि जातो। कां हें असें करी तो ? ॥ ध्रु०

येतां गमे दुरावा। निघतां गमे वळावा

सुखदुःख-हेतु होतो। कां ?

न दिसे क्षणैक डोळां। होतात प्राण गोळा

हृदयास पोळवीतो। कां ?

स्मरणास चेतवीतो। निंद्रेस मालवीतो

चित्तास चाळवीतो। कां ?

वाटे मुखा वघावें। नेत्रीं भरूनि घ्यावे

दिसतांच लाजवीतो ? कां ?

जवळीं बसा-हसावें। लटके गमे रुसावें

ठायीं विचार विरतो। कां ?

वदनांत नाम घोळे। हृदयांत मूर्ति खेळे

पारे तोच दूर पळतो। कां ?

न कळे कशास आला। जादू करूनि गेला

भ्रमणांत जीव दमतो। कां ?

---

पोपटपंची —

## समर्पण.

चाल—चंद्र चवथिचा.

विसरुं जरि तुला । आठव तव विसरांतहि सोडिना मला

विवश वासना । काय करूं नावरेच झुरत दर्शना

वाट पाहतां । पाहतांच यापरि का सारुं जीविता ?

तुज रुचे जरी । होउं दे तुझ्याच मनासारिखें तरी

दैविं जें असे । असुनि नाथ मी अनाथ होउं दे तसें

दिवस—यामिनी । सारिन यापुढतिं तुझ्या रूपचिंतनीं

सहज कधितरी । आलें तर येऊं दे स्मरण अंतरीं

आणि केधवां । यावेंसे वाटल्यास येइ तेधवां

तंववरी इथें । पायांची चाहुल मी बघत राहतें

हृदय मम उले । उलुं दे परि शिणवुं नको मृदुल पाउलें

दैव-योग हा । मी झुरेन मी मरेन तूं सुखी रहा

---

— पोपटपंची

## प्रेम–बाण.

कालंगडा—दादरा.

एकदांच पाहिलें

पाहिलें तयाक्षणींच आपुली न राहिले । ध्रु०

काय जाहलें कळे न

चित्त ठायिं राहिले न

वेध लागला जिवास, अंतरंग मोहिले

जी कधीच अनुभवी न

सृष्टि ती दिसे नवीन

सांगतां मुखी न येति भाव ते मनांतले

दृष्टि घे तिथेंच उडी

वृत्ति ती न सोडि घडी

ज्या घडीस नयन-नयन एकमेक भेटले

ठाउकें न नांव गांव

कळवुं केविं हृदयभाव

हे असें अधांतरीं जिणें न जाय साहिले

इंद्रियां न विषयभान

एक लोचनां तहान

हाच जरी प्रेमबाण, माखिला हलाहलें

---

## प्रभो उठावें !

चाल—चंद्रकांत.

जयजय जयजय विश्वपालका ! क्षीरसिंधुशयना !
अशरणशरणा ! प्रभो ! उठावें उघडावें नयना
धर्ममार्ग विघडिला अच्युता ! कां डोळेझांक
भक्तसख्या ! कां अर्जुनि पडेना श्रवणिं करुण हांक ?
काममदादिक असुर मातले स्वैरगती रमती
क्षमादयाधृति सत्यतपादिक वनोवनीं भ्रमती
कर्तव्याकर्तव्य कळेना व्याकुल मति झाली
उद्भवलें भय चोहीकडुनी भ्रांति मना पडली
धर्मध्वज मोडुनी अधर्में मांडियली दैना
कौतुक कुठवर बघसि दयाळा ! येऊं दे करुणा
असह्य झाला सहन होइना दुष्टांचा ताप
शरण शरण तुज दीनोद्धरणा ! तूंच मायबाप

---

— पोपटपंची

## समश्लोकी षट्पदी.

### वृत्त–गीति.

अविनय हरण करीं हरि! दमवि मना शमवि विषयमृगतृष्णा।
भूतदया विस्तारीं तारीं संसारसागरीं कृष्णा!

सुरनदि पराग ज्याचा, परिमल मधुमधुर सच्चिदानंद
ते भवबंधविमोचक वंदी हरिपद–सरोरुहद्वंद्व

भेदहि जरी निमाला तरि मी तुमचा, तुम्ही न मम देवा!
सागरि तरंग उठतो कैसा सागर तरंगिं सामावा

गिरिवरधर! बलिबलहर! दनुजकुलामित्र! मित्रशशिनयना!
दर्शन तुझे सुदर्शन देउनि विसरविं समस्त भवदैना

मत्स्यादिकि अवतारीं तारिसि बुडत्या सदैव वसुधेला
जगदीश्वरा! उदारा! भवभीता मजहि तार जगपाला!

दामोदरा! गुणनिधे! मदनमनोहर! मुकुंद! गोविंदा!
दावुनि पदारविंदा तोडीं सदया! मदीय भवबंधा

नारायणा! शरण्या! शरणागत मी त्वदीय पदकंजीं
माझ्या वदनसरोजीं घालो ही नित्य षट्पदी रुंजी

---

*

# जगतापासून दूर पळणाऱ्यास !

चाल—मज गमे ऐसा जनक तो.

खचित हें सारें जग तुझें ।

तूं जगाचा । ध्रु०

तूंच निर्मिलें तूं वाढविलें
तूंचि तयाला रूपहि दिधलें
अनंत नामीं भूषित केलें
होणारहि तें लीन तुजमधें । सारें०

तुझिया हर्षे प्रसन्न होतें
दुःखानें तव सुकुनी जातें
प्रेम करिशि तरि प्रेमळ बनतें
जसें करिशि त्या तसें बनतसे । सारें०

बैस वायुच्या दोल्यावरती
स्वर्गंगा धरिं दोरी हातीं
झोके घेई अंबरप्रांतीं
शंका कसली चल खेळ सुखें । सारें०

वसुंधरेला करीं गुदगुल्या
सूर्यालागीं दाविं वाकुल्या
बांध विजेच्या पायिं सांखळ्या
खेळविं त्यांना अपुल्यासंगें । सारें०

— पोपटपंचा

सिंधूचें मैदान येवढे
तत्पर सारें तुझिया क्रीडे
स्वैर त्यावरी उडे बागडे
संकोचितपण टाकिं मनाचें । सारें०

जाशिल कोठें जगता त्यजुनी
ओढिल तुजला हे तेथूनी
खेळावें तूं त्यासह म्हणुनी
तें तव प्रेमाचेंच भुकेलें । सारें०

अनंत ब्रह्मांडांचा स्वामी
वसतो तुझिया अंतर्यामीं
कसली चिंता भीति रिकामी
ओळख तूं निजरूप आपुले । सारें०

यावरि आतां या जगताने
सुखशिखरावरि सदैव रमणें
दुःखगुहेरिं वा लोळत पडणें
सर्वथैव हें असे तुजकडे । सारें०

पोपटपंची —

## जगन्मोहिनी.

चाल–घनःश्याम.

वाजव वाजव जगन्मोहना ! वाजविं रे ! मुरली
पुनः ऐकुं दे, या श्रवणांची आस नाहिं पुरली
यमुनापुलिनीं वृंदाविपिनीं वाजविलिस मुरली ।
विश्व मोहिलें चराचराची त्या रवि मति मुरली
आनंदानें विश्व कोंदले शोक लया गेला
हृदयगिरीवर सौख्यसुधाकर आला उदयाला
प्रसन्न झाले मनोवृत्तिनभ अशेष जीवांचें
पवित्रतेचा पुण्य गंधवह जगतितलीं नाचे
वृत्तींची विषमता लोपली द्वैतभाव हरला
प्रेमाचा वर्षाव जाहला आत्मभाव भरला
अहिनकुलांचें सख्य जाहलें वैरभाव लोपे
शार्दुलकंठी कंठ ठेवुनी धेनु सुखे झोपे
निसर्गनिर्मित रिपुही बनले परस्परप्रेमी
क्लेश–दुःख–भय अशेष विरलीं त्या नादब्रह्मीं
पूर्णब्रह्मा ! ब्रह्मचि केले ज्या नादें जीव
पुनः तीच रे ! जगन्मोहिनी मुरली वाजीव

... ... ...

तसाच पुनरपि कुरु–समरांगणिं भारतसंग्रामीं
जगन्मनोहर तव मुरलीरव दुमदुमला नामी

— पोपटपंची

ज्ञानरूपिणी नादसुधा ती पडली जों श्रवणीं
मोहतमोजड जीव जहाला जागा खडबडुनी
स्वस्वरूपाची पडली होती विस्मृति बहुकाळ
स्मरण तयाचें झालें, होतां ज्ञान-उषःकाल
प्रबोधरविची किरणें फांकुनि आत्मतेज उजळे
अज्ञानाचा घूक दडाला भ्रांतिपटल फिटलें
ठाण उठविलें त्वरित, सदाचें ' अहं ' भुजंगानें
स्वस्थानिच तो विरूनि गेला तव मुरली-गानें
प्रसन्न झाल्या वृत्तिकमलिनी मानसकासारीं
त्यावरि गुंजे सोऽहं-षट्पद अखंड-संचारी
संशयजडता लोपुनि तळपे अभिनव चैतन्य
प्रसन्नतेचें मनःसृष्टिवरि पसरे लावण्य
कर्तव्याचा अस्फुट पथ तो स्पष्ट दिसूं लागे
विस्मृतपथिं मग सज्ज जाहला जीवहि अनुरागें
कर्तव्याच्या पथा लागला ज्या नादें जीव
पुनः तीच रे ! जगन्मोहिनी मुरली वाजीव

... ... ...

सांप्रतकालीं ती वनमाली ! मंजुल नाद-सुधा
श्रवणीं प्याया हृदयिं भराया उत्सुक ही वसुधा
सत्यज्ञानावर्षण पडलें दडले बोध-घन
स्वार्थवंडकरतप्तसुदुःसहतृष्णावालुकण
हृदयविभंजन मदप्रभंजन धांवे चहुंकडुनी

पोपटपंची —

धुंद जाहल्या दिशा उचित पथ न दिसे मुळिं नयनीं
प्रेमाचा दुष्काळ पसरला शांतिवारि न मिळे
जीवितयात्रा दुष्कर झाली मानस-सर सुकलें
तशांत पेटे प्रचंड वणवा जीवन-कलहाचा
ऐशा विषमीं तव मुरलीविण आश्रय वद कैचा
शांतिजलाविण मीन तसे हे तळमळती जीव
त्यां निववाया जगन्मोहिनी मुरली वाजीव

---

— पोपटपंची

## निर्देश.

चाल—उद्धवा शांतवन.

इच्छिसी सौख्य जरि व्हावें
भटकसि कां येथें तेथें ।ध्रु०
हें सकलहि मृगजल बापा !
मानिसी जलाशय ज्यातें
शारदी घनांची छाया
तप्ताला सुख का देते ?
जातील वृथा तव यत्न
उरतील श्रम ते नुसते
इच्छिसी सुखाचा प्रांत
परि भिन्न क्रमिसी पंथ
जरि फिरसि कल्पपर्यंत
नच जुळे सुखाचें नातें ।भट०
हें सोड भटकणें सारें
स्थिरचित्त पळभरी होई
तुज कथितों मार्ग सुखाचा
मज मननयुक्त मन देई
तें तेंच सौख्य बघ बापा !
या प्रेमपथानें जाई
तें नंदगृहांगणीं लोळे
तें यमुनापुलिनीं खेळे
त्या लुटिती व्रजिंचीं बाळे
तूंही त्या भोग सुखातें ।भट०

पोपटपंची —

## श्रीराम-राज्याभिषेक.

( वसंततिलका. )

रे क्रोधकाम ! परिसा वच मित्रभावें
आतां मदंतरिं तुम्ही क्षणही नसावे
जा जा निघूनि विषयांसहि घेउनी जा
कीं यावया निघतसे रघुनाथ राजा

गे कल्पने ! कुटिल टाकुनि देइं वेष
नेसूनि शुद्ध वसनें भज राघवेश
ह्या एषणादि सखिया करिं दूर वेगे
राजाधिराज रघुनायक येतसे गे !

सोडूनि हे तव समस्त विचित्र खेळ
हो सत्वरीं स्थिर मना ! नच लावि वेळ
आतांच येइल रघूत्तमराजहंस
जाऊनि सन्मुख तयास तिथेंच ऐस

बाई अहंमति ! तुझें नच येथ काज
झालें तुझे सकल वैभव नष्ट आज
झाला पुरे अजवरी अधिकार तूझा
आला पहा प्रियसखा रघुराज माझा

जी जाहली तुजमुळें अनिवार मत्त
मोहीं जिनें फसविलें मजलागिं नित्य

पोपटपंची —

घेऊनि जाइं तव ती ममता-खसाही
कीं ही फिरे बघ ! रघूत्तम-नामद्वाही

या टाकुनी विषयसंगति इन्द्रियांनो !
आतां तयां फिरुनि चित्ति नकाच आणों
व्हा सर्व नित्य भगवत्पर सावधान
सेवा सुखैकघन तो करुणानिधान

द्वारीं तुम्ही श्रवणहो ! करुनी पहारा
सन्नामघोष कळवा प्रभुलागिं सारा
सर्वत्रही नयनहो ! प्रभुचीच सत्ता
पाहा अबाधित, करा निज दक्ष चित्ता

त्वां सेविले अजवरी रस फार जिव्हे !
त्याचें गडे ! उचित सार्थक तूं करावे
मी देतसें तुजसि वृत्ति महत्पदाची
हो भाट संतत अतां रघुराजयाची

प्राणा ! तुम्ही सतत टेहळणी करावी
दुर्वृत्ति आंत कसलीहि न येउं द्यावी
'रामोऽहमस्मि' अनुवृत्ति धरूनि जीवीं
सेवा अखंड अशि ही प्रभुची करावी

... ... ...

पोपटपंचा —

सिंहासनावरि अधिष्ठित रामराव
आले प्रधानपदि सात्विक अष्टभाव
प्रेमामृतें प्रभुवरी अभिषेक झाला
कंठीं समर्पिलि तदा अनुभूति–माला

संपूजिलें गुरुकृपोदय–अर्घ्य–पाद्यें
गर्जिन्नलीं तर्यिं अनाहत चारु वाद्यें
प्रारब्ध–संचित तसें क्रियमाण यांची
ती जाळिली निरवशेष हवाइ* साची

सेनापतीपदवि येत विरागराजा
तेणें स्वयें दमविलें अरिंच्या समाजा
घेऊनि साह्य अतिसुज्ञ विवेक–मंत्री
राहे सदैव अति सज्ज असंग–शस्त्रीं

आनंद मुख्य बनला घर–कारभारी
झाले सहायक तया पुरुषार्थ चारी
विश्वैक्यही खपत होउनि वेत्रपाणी
हर्षे सुमंगल रघूत्तम–कीर्ति वाणी

... ... ...

अंतःपुरीं विभव तैं कळसास गेलें
तद्वर्णनीं सकल शब्द अशब्द झाले

* दारुकाम.

ज्ञान-प्रभा उजळतांच तमो-विनाश
होऊनिया प्रकटला स्वरुपप्रकाश

श्रीराम जे वसति उन्मनिच्या महाली
तुर्या करी भवन-रक्षण त्या सुकाली
अंतःपुरी गति तिला क्षणमात्र नाही
द्वारीच ती बसुनि राहतसे सदाही १५

द्वारावरी करिति रीघ परादि वाचा
होई पुढें पुढिल कुंठित मार्ग त्यांचा
व्हाया प्रवेश पुढती न सुचे उपाय
होती निवृत्त मग त्या करणार काय ?

... ... ...

अंतःपुरी विहरती नव-भक्ति-नारी
लीला-विलास करिती बहु सौख्यकारी
नानापरी करुनिया सुविलास-हास
प्रेमें सदा रमविती प्रभुच्या मनास

कोणी मुखें गुणगुणी प्रभुनाम-गान
कोणी करी श्रवण तेंचि भरुनि कान
वर्णी कुणी रुचिरशा भगवद्यशाला
कोणी चुरी प्रभुपद-द्वय-सारसाला

— पोपटपंची

रामा कुणी भगवदर्चनिं रंगलीसे
वंदी कुणी प्रभुपदाब्ज विनम्रशीर्षें
सांडूनिया विषयजात सुखें अनित्यें
कोणी करी सकल दास्य सहर्षचित्तें

एकीं तदा प्रभुशिं सख्यचि जोडियेलें
हासे रुसे प्रभुसवें बहु खेळ खेळे
सोसे क्षणैक न वियोग तिला सख्याचा
तो धन्य धन्य किति दैव-विलास तीचा

ध्यानांत पूर्ण रमली कुणि एक रामा
गेली स्वयें विसरुनी निज-रूप-नामा
चित्सौख्य-सिंधु-सलिलीं सुखरूप झाली
श्रीरामचंद्रविभुच्या स्वरुपीं विराली

••• ••• •••

# विराणी.

## कालंगडा—धुमाळी.

कुणि कांहिं म्हणा, कुणि कांहिं म्हणा
अनुसरलें अपुल्याच मना ॥ ध्रु०
रीत म्हणा, विपरीत म्हणा कुणि
दिलें झुगारुनि आवरणा ॥ कुणि०
रीति कुरीती, नीति अनीती
आतां उरली चाड कुणा ॥ कुणि०
लोकलाज भय धरूं कशाला
मागायाचें काय जना ! ॥ कुणि०
जळल्या साऱ्या आशा मनिच्या
पुसल्या उरल्या त्याहि खुणा ॥ कुणि०
स्वैर सोडिले तारुं मनाचें
त्यजिला रुळला मार्ग जुना ॥ कुणि०
मेले सासर माहेरहि तें
मिटला विटला आप्तपणा ॥ कुणि०
जीव भरेना हौस पुरेना
वाढतोच घरिं काम दुणा ॥ कुणि०
यास्तव हा 'परपुरुष' परिणिला
मन मिनलें गोविंदगुणा ॥ कुणि०

---

पोपटपंची —

## चिमणा श्रीकृष्ण.*

चाल—चंद्रकांत.

चिमण्या गोपी चिमणीं वत्सें चिमण्यांचा मेळ
चिमणा कान्हा गोपहि चिमणे चिमणेसे खेळ
चिमणा भंवरा चिमणी जाळी चिमुकलाच चेंडू
चिमणा कृष्ण कन्हैया खेळे चिमणा विटि-दांडू
चिमणी कटि पीतांबर चिमणा चिमणि माळ कंठीं
चिमण्या गोपसमाजीं शोभे चिमणा जगजेठी
चिमणी मुरली चिमण्या बोटीं चिमुकल्याच ओंठीं
वाजवि चिमणा धावुनि चिमण्या वत्सांच्या पाठीं
चिमण्या गोपी चिमणी मडकीं चिमणें दहिं-दूध
चिमणीं पानें मांडुनि भरविति चिमणा गोविंद
चिमणीं वत्सें चिमण्या हरिचें चाटितात अंग
चिमण्या हातीं त्या गोंजारी चिमणा श्रीरंग
चिमणे बल्लव झुंजझुंजुनी थकति वाळवंटीं
चिमणा श्रीहरि त्यां कुरवाळी लावुनि निजकंठीं
राज्य चिमुकलें प्रजा चिमुकली चिमुकलाच राजा
देवहि चिमणा भक्तहि चिमणे चिमणीशी पूजा

---

* मध्वमुनीश्वराच्या पदांत फेरफार करून.

— पोपटपंची

## बाळ.

चाल—मज बोध करी—

किति गोड बाइ ! बाळ जसें कमल उमललें
सौख्याचें सार सकल वदन चिमुकलें । ध्रु०

कुंदाच्या उगवाया लागल्या कळ्या
माथ्यावरि कुरळ्यांच्या रुळति साखळ्या
मखमाली गालिं कशा खेळती खळ्या
ओठांच्या पाकळ्यांत ब्रह्म सांठलें

हास्याचे मधु तुषार विखरि चहुंभरी
बोबडिया रत्नांच्या उधळितो सरी
वांटि भरभरून मुठी प्रेम-माधुरी
विश्वाचें मोल करी फोल सोनुलें

जादुगार हा लबाड चित्त चोरतो
चित्तावरि आपुलेंच चित्र कोरतो
मूकपणें आत्मभाव आंत ओततो
जाउं न दे दृष्टि कुठे नयन अडविले

—

— पोपटपंची

## आवडतें फूल.

हास हास रे फुला ! । तुझ्यांत जीव गुंतला
वैराण रान रे फुला ! । फिरुनि जीव भागला
प्रमोद सर्व लोपला । उदास-भाव वाटला
पाहतांच परि तुला । प्रेमभाव दाटला । हास०
दोन्हि नयन लोभले । मन मनास विसरले
दोन्हि बाहु पसरले । तुजसि जवळ घेतले
भिन्नभाव लोपला । एक जीव जाहला । हास०
कर करांत मुख मुखीं । जीव जाहले सुखी
प्रेमभाव व्यापला । तूं मला रे ! तूं मला । हास०
चुंब चुंब चुंबिलें । वदन वदनि बिंबले
द्वैतभान भंगले । प्रेमरंगि रंगले
हर्षपूर वाढला । त्यांत जीव लोटला । हास०



— पोपटपंची

## आई आणि बाळ

वृत्त–उपजाति

पूजा करी मौन धरूनि आई
तेथेच तों खेळत बाळ येई
साहित्य पाटावरि तें पुजेचें
बघे, बसे, प्रश्न करी मजेचे

" आई इथे तांदुळ हे कशाला
हा हार कोणास्तव सांग केला
मी लावुं का चंदन हें कपाळीं
दे ही मला साखर तूप गोळी

हे रांगतें बाळ असे कुणाचे
एक्याच जागीं बसलें न नाचे
नाचे न खेळे न उड्याहि मारी
मला दिसे हें तर मठ्ठ भारी

कां तोडिल्या ह्या तुळशी सुरेख
मी घेउं का यांतिल सांग एक "
मौनामुळें कांहिं वदे न आई
तेणे जरा बाळहि धीट होई

म्हणे ' पितों हें बघ दूध आई '
बोलूनि वाटी उचलूनि घेई

पोपटपंची —

आईकडे पाहत लावि ओठीं
हासूनि तें सर्वहि दूध लाटी
त्याचा असा खेळ पहात आई
वारी न त्यातें न वदेहि कांहीं
प्रेमा मनीं ये उसळूनि मोठा
दावी वरी राग उगीच खोटा

आणावया दूध दुजें घरांत
तेथूनि तैशीच उठूनि जात
तों हा दह्याची उचलूनि वाटी
तीही सुखे स्वस्थ मुखांत लोटी
घेऊनि येई जंव दूध आई
झालें दिसे गट्ट तिला दहींही
आईस येतांच बघूनि तेथें
टाळ्या पिटी तो भरल्याच हातें

प्रेमा तिचा तै उसळूनि आला
शिक्षा म्हणे मी करुं काय याला
कडेवरी घे उचलूनि त्याला
मुखीं मुक्यांचा भडिमार केला

---

— पोपटपंची

## " आनंद आला आनंद "

( पोस्टमननें आनंद आणून टाकतांच मुलांची मौज– )

आनंद आला आनंद ।
यारे गोपाळ गोविंद । ध्रु०

गोष्टि मजेच्या उपदेशाच्या
सान मुलांच्या थोर जनांच्या
सुंदर कविता नानापरिच्या
होउं वाचुनी धुंद । यारे०

गोड गोड हे वाचूं चुटके
हास्यरसाचे घेऊं घुटके
सोडवुं कोडीं, मन नच भटके
तोच लागतो छंद । यारे०

बघा बघा किति चित्रें नामी
शिवाजि राजे समर्थ स्वामी
शूर झांशिची राणी लक्ष्मी
टिळक आणि अरविंद । यारे०

किंवा दुसरी चित्रे सुंदर
अकबर अफजुलखान शिकंदर
दयानंदजी धर्मधुरंधर
स्वामि विवेकानंद । यारे०

पोपटपंची —

मजेदार किति प्रवासवर्णन
कुठें न जातां घरींच बैसुन
स्थळोस्थळांचें घडतें दर्शन
वाहवा रे ‘ आनंद ’। यारे०
या या वाचा वाचुनि दावा
स्नेहि सोबती यां बोलावा
ज्ञानाचा ह्या खाऊं मेवा
कलाकंद गुलकंद । यारे०

---

## सांकडें.

आलें फूल फुलावयास, उलुनी झाली कली मोकळी
झाला किंचित केसरांश उघडा, येती जुळोनी अली
वाहे मंद समीर गंध लुटुनी फेकीत चोहींकडे
बैसे मस्तकिं वा पडे पदतळीं आतां पडे सांकडें

---

—पोपटपंची

## खेळूं ये गोविंदा!

राग– सोहनी.

खेळूं ये गोविंदा। आनंद कंदा । ध्रु०

पाळणा हृदयाचा केला
वरि बैसावे नंदलाला
देइन झोके परमानंदा । खेळूं०

निर्जन एकांतीं विपिनीं
चपल मनासहि चुकवोनी
प्रेमभरें लुटुं ये स्वानंदा । खेळूं०

तूंच जिवाचा संवगडी
दिधली तुझिया प्रेमिं बुडी
कमलाविण गति काय मिलिंदा। खेळूं०

---

पोपटपंची —

## बावळट बाळू.

चाल–शारदे ! दास कामदे !

ऊठणे, फिरुनि झोपणें, उगिच लोळणे, जांभया दे‹॥

यापरी आमुचा बाळु उठे उशिरानें

मुख धुणें, चहा ढोकणे, बुकें उघडणें, कांहिंतरि बघणें

तीं तशिच टाकुनी अंग धुवाया पळणें

विसळणें, कशाचे धुणें, पाणि ओतणें, अंग नच भिजणे

धुंदीत धोतरें साऱ्या घरभर फिरणें

अचमने, तीन टाकणें, ताटि बैसणे, बकबका गिळणे

दफ्तरासाठि मग तीन तास धडपडणें

सांडिली शाइ ती सदऱ्यावर किति तरी

कोटास एकही गुंडि दिसेना बरी

दोन्हिही खिशांची लोंबकळे लक्तरी

नेसणे, मधिच सूटणे, बुकें सांडणें, गोंधळुनि जाणें

काय् दिसे ध्यान तें वा ह वा ! राजसवाणें

— पोपटपंची

## लहान मुलींची एक शाळा पाहून.

चाल—जगदीशा तात–

वाहवा ! वा ! कशि छान लाविली बाग
ह्या लतिका ह्या लतिका खेळति जागोजाग ध्रु० ॥

पावन हें जीवन ज्ञानज्ञऱ्यांचें
जीववितें जीवन या लतिकांचें
ये भरतें पाहुनि आनंदाचें
क्षणिंच अहा ! हरतो येथें अंतरिंचा शिणभाग

वाढाव्या लतिका ज्ञानजलानें
त्यां यावीं मधुर मनोहर सुमनें
जगत भरो सयश सौगंधानें
उपवनिं या वृद्धिस पावो जनतेचा अनुराग

—

# गीतराघव.

## गीत १ लें.

### श्रीरामविलाप.

चाल—उद्धवा शांतवन—

प्रियतमा सखी सुकुमारी। टाकुनि मज कोठें गेली । ध्रु०
हें शून्य सकलही वाटे। प्रियतमेवीण कांतार
आनंद लोपला सारा। सर्वत्र दिसे अंधार
बघुं कुठें कुठें तरि शोधूं। तें माझें जीवितसार
ही तीच काय दलशाला
की चुकलों निजउटजाला
करुं काय मतिभ्रम झाला
दृष्टीही अंध जहाली । टाकुनि०

रुचिराक्षि ! कोमले ! सीते ! । परिहास पुरे करिं आतां
हें हृदय विदीर्ण जहालें। मुखचंद्र तुझा न पहातां
दर्शनामृतातें सिंचीं। निववीं या विरहदवार्ता
नाणिला हेममृग म्हणुनी
रुसलीस काय तूं रमणी
आणीन चंद्रमृग धरणी
मुखचंद्र दाविं या कालीं । टाकुनि०

— पोपटपंची

ही हरिणशावकें सुशिले ! । पाळियली त्वां जीं प्रेमें
सारिका तुला रिझविति ह्या । बोलुनी मधुर बहु नेमें
ह्या लता वेंचुनी ज्यांची । वेणींत घालिशी कुसुमें

हीं सर्व साध्वि ! तुजवीण
जाहलीं पहा अति दीन
परिहरीं तयांचा शीण

निष्ठुरता अशि कां धरिली । टाकुनि०

भासला न पळही दयिते ! । तुजसंगें हा वनवास
मुकलो जरि राज्यसुखाला । तें सुख दे तत्र सहवास
तूं संनिध असतां सखये ! । मानिलें तुच्छ विश्वास

हासलो चक्रवाकाला
लाजविलें विरहि मृगाला
परिहास पिकांचा केला ।

परि अतां सर्व ती फिरली । टाकुनि०

शिवचाप भंगुनी करि या । परिणिलें तुला सुकुमारी !
उपयोग काय परि आतां । निष्फळा शक्ति ती सारी
असहाय बघुनि मज छळिती । स्मर वसंत वायु तमारी

ये धावुनि येइं सहाया
हा यांचा मद जिरवाया
क्षण धरा रिपूंनो ! स्थैर्या

ही पहा प्रिया मम आली । टाकुनि०

पोपटपंची —

पाहे दाही दिशांतें सकरुण नयनी म्लान झाली मुखश्री
सीते ! सीते ! म्हणूनी तरुनग कवळी, भ्रांतिनें व्यापिली धी
दुःखें टाकी उसासे धरणिं गडबडा अंग टाकूनि लोळे
मावेना शोक पोटीं म्हणुनि जलमिषें देति त्या वाट डोळे

---

## गीत २ रें.

### विरहिणी सीता.

चाल—अजि अक्रुर—

किति काळ असा विरहताप सोसावा
कधिं पाहिन प्राणविसावा । ध्रु०
हे नेत्र भुकेले झुरती
आसवें न त्यांतिल खळती
कधिं पाहिन वल्लभमूर्ति
अशि उत्कंठा फार लागली जीवा । कधिं०
कशि बुद्धि जाहली खोटी
पाठविलें हरिणापाठीं
तें दुःख कालवे पोटीं
त्या चरणांची पळहि न घडली सेवा । कधिं०

— पोपटपंची

ते प्रसंग वनिंचे स्मरती
किति आठवुं निर्मल प्रीती
जाहलि हा ! स्वप्नापरि ती
रे दुर्दैवा ! केवि साधला दावा । कधिं०

" जानकी ! प्रिये ! सुकुमारी !
श्रमलीस वनीं तूं भारी
विश्रांति घेउं नदितीरीं "
पथि वदुनि असे, मन्मुखचंद्र पुसावा । कधिं०

पर्णाची रचुनी शय्या
लावुनी हृदय मम हृदया
मधुर कथा मज रिझवाया
किति सांगुनिया श्रम तो विलया न्यावा । कधिं०

त्या कीर केकि हरिणांनी
किति सौख्य दिलें मज रानीं
विपरीत परी विधि-करणी
की तेच अतां दुःखद गमती जीवा । कधिं०

तो रम्य सुधाकर आतां
जाहला विषाचा भ्राता
जीवितेश संनिध नसतां
या सृष्टीनें स्वधर्म का सोडावा ? । कधिं०

पोपटपंची —

सुखसार पारखें झालें

हातिच्या निधाना मुकलें

प्रेमास सुखासुखिं विकिलें

त्या प्रेमाचा ध्यास लागला जीवा । कधि०

प्राणेशा ! सदया ! रामा !

सुखसारा ! हृद्विश्रामा !

विसरलांत का तो प्रेमा

द्या दर्शन हो ! विलंब पळहि न लावा । कधि०

ती शोकपूर्ण-हृदया विरहार्त बाला

ऐशा स्मरे कितितरी निज पूर्वलीला

त्या सर्व पूर्वचरिता स्मरुनी स्मरूनी

झाली विमूर्छित सती विरहेंकरूनी

---

—पोपटपंची

## गीत ३ रें.

### विरही रघूत्तम.

सीते ! सीते ! विमलचरिते ! प्रेमले ! चारुशीले !
कां गे ! ऐसे कठिण मन तूं कोमले ! आज केलें
ये ये ये ये तुजविण गमे शून्य हा जीवलोक
भंगूं पाहे हृदय दयिते ! जाळितो देह शोक

चित्तांत सीता वदनांत सीता
दृष्टींत सीता श्रवणींहि सीता
सीतामया वाटुनि सृष्टि सारी
जे जें दिसे त्यास तदा विचारी

चाल—मन मजला वाहिलें—

पाहिलि का सुंदरी । जनक कुमारी कुणितरी । ध्रु॰

वा उटजा ! तव प्रसन्नतेला
जिचा समागम कारण झाला
सांग कुठें रे ! विदेहबाला
तीं माझी हृदयेश्वरी

सकल रम्यता तव वनदेवि !
नित्य जियेच्या ठायिं दिसावी
म्हणुनि सखी मम मत्सरभावीं
दिसते लपविलि त्वां खरी

पोपटपंची —

दिव्य तरूंनो ! तुमचीं कुसुमे
परम मनोहर वेंचुनि नियमे
भूषवि निजतनु तन्वी प्रेमें
कां रुसली तुम्हांवरी ?

असाच मंजुळ रव सुंदरिचा
लाभ कसा तुज झाला याचा
शोध खचित तुज ठावा सखिचा
सांग कोकिले ! सुस्वरीं

अविरत घनहो ! नभिं संचरतां
तप्त जनांचा ताप शमवितां
दिसली का ती मत्प्रिय दयिता
भूवरि या वा अंबरीं ?

मृदुल लतांनो ! इथें विहरतां
नित्य पतिसवें इथेंच रमतां
मम दयितेची कांही वार्ता
असेल ठावी द्या तरी

सखिच्या वेणींतिल कुसुमांशीं
खेळुनि पवना ! गमतें येशी
सांग कुठें प्रियतमा सुकेशी
बोल बोल रे ! सत्वरीं

— पोपटपंची

कमलवनीं मधु मधुपा ! लुटशी
गमन गडथा ! तव चोहों देशीं
प्रिया दिसलि का पंकजकोशीं
पुष्पांच्या वा केसरीं
हरिणशिशूंनो ! स्फारुनि नयनें
काय बघतसां उन्नत वदनें
मम दयितेचीं कोमल चरणें
दिसती का मार्गावरी
ढाळित अश्रू सरिते ! कां गे !
शोधित जातिस सखिच्या मागें
मीही येतों तुझिया संगें
थांब थांब गे ! क्षणभरी
काय करूं हा ! कुणि न बोलती
हसती खेळति निघुनी जाती
भ्रष्टश्रीका मज अवमानिति
दुःख कुणातें कथूं तरी

भ्रमुनि दशदिशांना धुंडि कांतार सारें
पुसत तरुनगांना शुद्धि ऐशा प्रकारें
प्रतिवचन कशाचें कोण देणार तेथें ?
विकलहृदय तेव्हां पीटि तो मस्तकातें

---

पोपटपंची —

## गीत ४ थें.

### सीताविलाप.

स्रवन्नश्रुक्लिन्ना निरशनकृशा म्लानवदना
स्थिरासीना दीना मलिनवसना शोकसदना
भयत्रस्ता सीता प्रियजनवियुक्ता गतरुची
जणो छिन्ना शाखा धरणिपतिता कल्पतरुची

महाव्याघ्रवृंदीं जणो ती कुरंगी
भयें व्याकुला जाहली अंतरंगीं
त्यजी शोक-निश्वास पाहे सभोंतीं
स्मरे अंतरीं प्रेमला राममूर्ती

चाल—ईश्वरपंकज—

निजजनजीवन! हे रघुनंदन! बघशिल अंत किती
तुजवीण सौख्यमूर्ति। शून्य जगती । ध्रु०

दुर्विधिचा जो मूर्त नग
अंतरिलें तव चरणयुग
जळो जळो तो हेममृग
श्यामलसुंदर रूप मनोहर दावीं प्राणपती! । तुज०

सुरतरु सुफलित अवगणुनी
गमे विषद्रुम इष्ट मनीं
त्यजुनि रत्न की काचमणी
जणुं इच्छावा हा हतदैवा! झाली तेवि गती । तुज०

मोहनिशा ती दूर पळे
अनुतापे मन होरपळे
लोटुं नको विरहांत बळें
क्षमा क्षमावर करि दीनेवर न करीं रुष्ट मती । तुज०
मीन जलांतचि जीव धरी
घनासि चातक मुख पसरी
चकोर-जीवन चंद्रकरीं
तेवि तुझे पद मजसि सुखप्रद, नाहीं अन्य गती । तुज०
तरंग मी तव सागर तूं
मी पट केवल तूं तंतू
मी छाया विभु ! तूं वस्तु
तूं मम जीवन नसे तुझ्याविण मजला भिन्न स्थिती । तुज०
खरतर विरहानल पेटे
ही तनु जाळिलसें वाटे
ये ये धांवत ये नेटें
दर्शन-जलकण सिंचिं दयाघन लाविशि वेळ किती ? । तुज०
प्रतिपळ युगसम वाटतसे
नयन दर्शना होति पिसे
निवविं हृदय हें प्रेमरसे
हृदयविहारा ! जीवितसारा ! दाविं तुझी मूर्ति । तुज०

पोपटपंची —

कै पाहिन तव पदकमलां
जीव उताविळ बहु बनला
नको नको हा प्राण मला
प्रियजनविरहित हें जडजीवित वाटे भार अती । तुज०

झाला शोक असह्य मस्तक फिरे आशा दिसेना कुठें
वाटे जीवित भारभूत सगळें त्यागार्थ ती तै उठे
झाला निश्चय पूर्ण तों श्रवणिं ये **श्रीरामनामामृत**
पाहे सन्मुख जीवितेश—करिंची मुद्रा स्वनामांकित

---

— पोपटपंची

## गीत ५ वें.

### मुद्रिका.

मुद्रिका बघुनि विस्मित झाली
' ही इथें ' म्हणतसे कशि आली
प्रीतिनें उचलुनी कुरवाळी
चुंबुनी स्वहृदयीं कवटाळी

चाल—म्यां नयनिं देखिला—

प्रियसखे ! मुद्रिके ! अवचित दिसलिस बाई !
आलीस कोठुनी कैशी वद या ठायां ? । ध्रु०

अति घोर पसरला होता हा अंधार
नच दिसे कुठेंही कोणाचा आधार
सर्वत्र निराशा, आशा लपली पार
हे भ्रांत जाहलें हृदय सुचेना कांहीं

नैराश्यतमीं या चंद्रिकाच झालीस
कीं मरणसमयिं गे ! सुधाच मुखि पडलीस
कीं कल्पलता मज रंका सांपडलीस
तव दुर्लभ दर्शन सुख बहु अंतरिं देई

वद कसा कुठें गे ! प्राणसखा रघुवीर
तो करी स्मरण का माझें गुणगंभीर ?
मज कुशल तयाचें सांग, निघेना धीर
तूं बोल बोल गे ! मौन टाकुनी बाई !

पोपटपंची —

श्रीचरण पुनः ते नयनीं पाहिन काय
तीं प्रेमळ वचनें श्रवणीं पडतिल काय
तो सुखद समागम मिळेल पुनरपि काय
हें सांग सांग तव चरणिं ठेवितें डोई

त्या धन्य तरुलता राम दिसे ज्यां डोळां
किति वानुं तयांच्या भाग्याचा सोहोळा
सकलही तयांचीं पुण्यें झालीं गोळा
कीं रामरूप त्यां दिसतें ठायी ठायी

आनंदगिरीच्या शिखरीं नांदत होतें
श्रीरामसमागम सुखवित होता मातें
परि मोह–प्रभंजन उठुनी पडलें येथें
हें दुःख टळाया उपाय कथिं मज कांहीं

मी परम अभागिनि मुकलें राघवपायां
निष्ठुरा आजवरि जगलें विरह सहाया
निष्प्रेम हृदय हें यांत न तिळही माया
शतचूर्ण म्हणुनि तें होत अजूनिहि नाहीं

तव दैवयोग किति थोर म्हणुनि वानावा
प्रभुविरह ज्या तुला क्षणभरही नच ठावा
पुण्यांश तुझा तो अभागिनिस मज द्यावा
तेणें तरि रघुपति ठेविल मज निज पायीं

— पोपटपंची

तो विशाल उदधी तरलिस कैशी माये !
हा दुःखार्णव मी तरेन त्याचि उपायें
मी तुझी जाहलें शिष्या पदरीं घे ये
श्रीराम-प्राप्तिला तूंच मला गुरु होई

---

## गीत ६ वें.

### प्रश्न-प्रणाली.

चाल—जागये रघुनाथ—

रामचंद्र मनमोहन नेत्र भरुनि पाहिन काय ! । ध्रु०
नयन-मधुर कोमल रुचि
नव-जलदश्याम शुचि
प्रेमधाम रामतनू नयन-विषय होइल काय
हें अंबर ह्या तारा
रविशशि हे हा वारा
सदय-हृदय कुपितरि हा विरहताप वारिल काय
त्रिभुवनभुवनोत्तंसा !
रघुकुलगुरु ! भो हंसा !
विरहि चक्रवाकिस या रमणदान करिशिल काय

पोपटपंची —

नित्य जिथुनि अमृतवृष्टि
ती मधुरा प्रेम-दृष्टि
अंतरिंचा दुःखानल शमवुनि सुख देइल काय
हस्तंगत सौख्यनिधी
हरि हा! प्रतिकूल विधी
विलसित तव दुर्दैवा! अजुनि पूर्ण होइ न काय
सतत रमवि जें मनास
ज्यांत सकल सुखनिवास
सुधाधवल विमलहास अनुभवास येइल काय
अयि अंबे! वसुंधरे!
क्षमा नाम धरिसि खरें
मम मानस-राजहंस पुनरपि मज देशिल काय
दुर्दमनीं प्रतिकृतांत
सत्पालनिं परम दांत
ते कर मज हृदयप्रांतिं कवटाळुनि धरितिल काय
जाउं तरि कुणास शरण
करिल कोण दुःखहरण
मजवरि होऊनि करुण प्रभुच चरण दाविल काय
अप्रतिहत गति तुजशी
अखिल जगीं संचरशी
दीन स्थिति मम वायो! रामचरणिं कथिशिल काय

— पोपटपंची

सर्वसाक्षि परमेशा !
पुरतिल का मम आशा
नयनिं बघुनि हृदयेशा जीव सुखी होइल काय
दिधला साधूस ताप
ते फळले सकल पाप
परि सज्जन मायबाप कोप शांत करितिल काय
अशेष कल्याण–धाम
योगिजन–मनोविराम
त्या चरणीं हें ललाम एकवार ठेविन काय
अशनिं राम, पानिं राम
वदनिं राम, नयनिं राम
ध्यानिं मनीं एक राम वृत्ति राम जाणिल काय
जाणुनि मनिंचा आशय
निरसाया दुःखविषय
कळवळुनी रामराय त्वरित पाय उचलिल काय

———

पोपटपंची —

## अहल्याकृत रामस्तुति.

चाल—हे सीते कोमल—

श्रीरामा ! मंगलधामा ! मुनिविश्रामा ! कलिमलहरपावननामा ।ध्रु०

हे अनाथजन—कनवाळा ! धावुनि आला, श्रमविले मृदुल चरणाला

मी अबला केवळ दीन, भक्तिविहीन जीवितही अन्याधीन

अधिकार न वेदाध्ययनीं, बहु अज्ञानी, परि दयालु तूं सुखदानीं

दीनेवरि केलिस करुणा, दावुनि चरणा, हे भवजलनिधिसंतरणा !

कशि होउं तरी उतराई

श्रीराम सांवळे आई !

चरणावरि ठेवुनि डोई

निशिदिनि तव गाइन नामा, पुरवीं नेमा, बा ! दिनकरवंशललामा !

जे चरण शिवाचे ध्येय, श्रुतीचें गेय, या सकल जगाचे श्रेय

ते आज देखिले डोळां, सुखकल्लोळा ! किति वानुं भाग्यसोहोळा

जाहलें जगत्रयिं धन्य, विबुधजनमान्य, भेटले विश्वचैतन्य

मुनिवर्यें दिधला शाप, वाटला ताप, परि तोचि होय सुखरूप

देखिला सुखाचा कंद

श्रीराम सच्चिदानंद

संसृतिचा तुटला बंध

यापुढतिं विनवणी रामा ! करि ही रामा, दे तुझ्याच चरणी प्रेमा

———

— पोपटपंची

## द्रौपदीचा धांवा.

चाल—वद जाउं कुणा शरण—

ये मुकुंद ! मुरमर्दना ! मुरलिवादना ! कृष्णराया !
मी दीन शरण तव पाया ।ध्रु०

गवसली हरिणि वृककरीं, होय घाबरी, धांव घेई
माय बहिणी कृष्णाबाई !

मांडिलें खळे निर्वाण, जातसे प्राण, विवश झाले
दाखवी त्वरें पदकमलें

मज नसे कुणी तुजविणे, करिल धांवणें, विषमकाळीं
भरंवसा तुझा वनमाळी !

तूं दीनबंधु म्हणविशी, काय मजविशी, रुष्ट होशी
जिवलगा सख्या हृषीकेशी !

हे वृद्ध गुरुजन फुका, बघति टकमका, दीन झाले
सामर्थ्य पतींचें लपले

जाहला धर्म आज दीन, वैभवे हीन, निःसहाय
तारील दुजा तो काय

ही वीर्य, पराक्रम, धैर्य, कला, चातुर्य स्वस्थ बसलीं
सारीच संकटीं फसलीं

सर्वत्र दिसे अंधार, नसे आधार, थार देई
घे धांव येइं गे आई !

पोपटपंची —

जे गजेंद्र तुज आठवे, येशि तै जवें, तीच घाई
आतांही करुनी येई!
काळही तुझ्या दाराीस, करुनि वर सीस, पाहुं न सके
खळ वसन तिचें हा हिसके
ही लाज कुणा गिरिधरा! स्वजनमाहेरा! बंधुराया!
जयकृष्ण सख्या यदुराया!

---

## भरत भेट.

चाल—शारदे! दास कामदे!

मी बाळ, तुझे लडिवाळ, करी प्रतिपाळ, नको त्यजुं माया
हें राज्य तुझें तूं स्वामि असासि रघुराया
तुजविणें, भार हें जिणें, कसा मग सहणें, भार राज्याचा
जो योग्य तयानें धर्म करावा त्याचा
वनगमन, योग्य हें तुज न, तुझे मृदु चरण, चुरिन मी हातें
ही राज्यधुरा सांभाळ चाल गेहातें
हा जीव वाहिला चरणिं तुझ्या प्रभुवरा!
मज विरहपावकीं लोटुं नको सुखकरा!
तूं बाप माय तूं तूंचि एक आसरा.
मृदुहृदय, नको करुं अदय, होइं गा सदय, जानकीकांता
मज नको मोकलूं कृपासिंधु भगवंता

---

— पोपटपंची

## भग्न हृदयांतील करुणोद्गार.

वृत्त–शार्दूल विक्रीडित.

आली एक लतेस रम्य कलिका आशा उदेली मनीं
की पावेल विकास हासुनि मला आनंद देईल ही
आनंदांकुर हा न जों उगवतो नेली खुडूनी कुणी
आशाभंग असह्य हा, पुरवला खंजीर छातींतला

येती अन्य अनेक रम्य कुसुमें दृष्टीपुढे साजिरीं
होतो हर्ष मना परंतु कलिका जाई न चित्तांतली
किंवा हीं कुसुमेंच भग्नहृदया देती तियेची स्मृती
द्याया दुःखचि काय सौख्य दिसते कांहीं कळेना खरें !

ती बाला लतिका विशुद्धहृदया आशेंत होती अशी
कीं, माझी कलिका प्रसन्न-वदना हासेल पाहीन मी
मी हासेन तिला बघूनि हसतां, डोलेन प्रेमामधें
वारंवार मुखास चुंबुनि तिच्या, लावीन वक्षस्थळीं
नेत्रीं आणुनि इंद्रियें तिजकडे पाहात राहीन मी
किंवा या पदरातळीं लपवुनी गाईन गीतें मधु
हें माझें सुखसार लोकिं सगळें हे सर्व माझें धन
आशांचा परि हा खचूनि पडला प्रासाद भव्याकृति

पोपटपंची —

नाहीं रूप न रंग गंध गुणही, आली गळायास जी
ना ज्यांचा उपयोग कांहिं जगतीं सोडूनि ऐशी फुलें
तोडाव्या कलिकाच मुग्ध अथवा पुष्पें गुणी साजिरीं
काला ! काय असें कठोरहृदया ! तूंतें रुचे नाकळे ?
होती सर्वचि सुंदर प्रिय जगीं मालिन्य कोणा रुचे
तेव्हां दोष वृथा तुलाच असला द्यावा कशाला गड्या
चित्ती एक परंतु शल्य सलतें औचित्य तू नेणसी
तेणें कृत्य तुझें मुळींच जगतीं संतोष दे ना कुणा
नाहीं हात तुझा जिच्यावर अशी वस्तूच लोकीं नसे
नेसी इच्छिसि तेधवां हरुनि ती, सामर्थ्यही हें तुझें
नाहीं रोध करावया कुणि दुजा कार्यास तूझ्या जगीं
कां घाई मग तोडण्यास कलिका तूंतें अशी होतसे ?

—

— पोपटपंची

## लीले !

दिंडी.

‘ पापा पापा ’ म्हणतांच जवळ येशी
ओठ अपुले चिमुकले मुखीं देशी
सौख्यसागरिं वादळें ऊठवीशी
परी सारें तें हरुनि कुठें जाशी ?

म्हणा बेटा ! एकदां गोड गाणे
असे म्हणतां भाव तो कर–मुखाने
करुनि दाविशि हलवोनि हात तोंड
कोण आतां पुरवील तसं कोड ?

माझि लीला कोणती सांग आतां
माय माझी कोणती पुसूं जातां
हात हृदयीं मारूनि दाखवावे
कितिक लीले ! गुण तुझे आठवावे

पाज अपुल्या बाळास दूध ‘ आई ’
उचल अपुलें हें बाळ जवळ घेई
बाहुलीतें चिमुकल्या जवळ घेशी
भाव आईचा करुनि दाखवीशी

पोपटपंची —

रडे लीला वाईट असे फार
एक थप्पड तर गडे तिला मार
असें म्हणतां आपुल्या गोड गाला
थापडीशीं, हिरमोड कधिं न केला

रडत असलिस राजसे ! जरि कितीही
'कृष्ण राधे' म्हणतांच रडें राही
पिटुनि टाळ्या लागसी हसायाला
कृष्ण–नामें तो बोध कुठुनि आला

कृष्णमंदिरिं घेऊनि तुला जातां
सहज तेथें टेकशी खालिं माथा
मूर्ति बघतां तव मुखीं हास्य खेळे
कशी कळली तुज कृष्णभक्ति बाळे !

उषःकालीं दररोज तूं उठावें
उठुनि साऱ्यां घरभऱ्यां जागवावे
हसुनि खेळुनि आनंद माजवावा
अशा रीतीं उगवला दिवस जावा

थवे चिमण्यांचे अंगणांत येती
तुझ्या भंवतींचें धान्य टिपुनि नेती
जाति येती खेळती पुनः जाती
तुझ्या हसण्याचा एक विषय होती

— पोपटपंची

येति चिमण्या आतांहि त्या तशाच
धान्य टिपुनी नाचती खेळतीच
परी लीले ! हासरी तूं न तेथें
सौख्य पूर्वीचें स्मरुनि दुःख होतें

हसुनि तर तूं सर्वास सुखविलेंच
परी रडुनीही सौख्य दिलें तेंच
हसें रडणें सारेंच सौख्य गेलें
झरा सुकला पाणीहि सर्व नेलें

कुठें जातां करितांहि कार्य कांहीं
क्षणहि लीला चित्तिंची हलत नाहीं
वस्तु जी जी दृष्टीस दिसे भासे
स्मरण देई, तीचेंच करूं कैसें ?

अशनिं पानीं वाचनीं विचारींही
कांहिं लीलेवांचुनी सुचत नाहीं
दिसे भासे परि दिसुनि दिसत नाहीं
विवेकाची तर गतिच पंगु होई

तुझ्या विषयींची अशुभ कल्पनाच
मनीं उठतां हृदयास देइ जाच
परी आतां प्रत्यक्ष तीच झाली
दैवें जन्माची हाय हाय आली

पोपटपंची —

दुःखदाहें देहास आग लागे
हृदय उकळे करपूनि चित्त भागे
वेदना त्या एकांतिं अश्रुपातें
शांतवीतों परि दुःख शमेना तें

दुःखि दुसऱ्याच्या बहुत बोध केला
तोचि माझा मज सकल विफल झाला
बोध करितांना नव्हति आग पोटीं
आग पोटीं तै बोध जिरे ओठीं

हृदय माझें हें करुनि चूरचूर
नेशि माझा बुलबूल कुठें दूर ?
क्रूरकर्म्या निष्ठुरा दुष्ट दैवा !
कुण्या जन्मीचा साधलास दावा

सर्व माझें लागलें तुझ्या हाता
समाधानाचा एक तंतु होता
तोहि बरवा वाटला तुला नाहीं
खुडुनि केल्या मज शून्य दिशा दाहीं

तुटुनि गेलेलें फिरुनि जुळुनि येतें
नष्ट झालें तें पुनः प्राप्त होतें
तशी पुनरपि भेटेल काय लीला ?
काय पुनरपि पाहीन तिच्या लीला ?

—पोपटपंची

द्रव्य कीर्ती अधिकार सर्व कांहीं
यत्न केल्या मिळतील वाण नाहीं
परी आतां भेटेल कुठुनि लीला
तंतु तुटला तो पूर्ण तुटुनि गेला !

---

## चहा—

## टळपणा.

चाल—नृपममता रामावरती.

लाविला गुलाबी रंग । किति सुंदर अमुच्या बंग–। ल्याप्रती
शोभती कसे हे खांब । त्यांवरी वेलिही लोंब–। ती किती
मोगरी चमेली कुंद । लाविलीं चहुकडे सुंद–। राकृती
अंगणी छानसा कुंज । वृंदावनिं तुळशी मंज–। ऱ्या अती
गुंजतात गुं गुं भृंग । तो नाद तयांचा गुंग–। वी मती
कवितेंत जरी यतिभंग । जुळविले यमक परि चांग–। ले किती

---

पोपटपंची —

## ही उदासीनता कां ?

चाल—लावणी.

उदासवाणी अशी भिरभिरा कुणास बघशी तरी
प्रसन्नता तव कुठें हरविली पूर्वींची साजिरी
आनंदाचा विलास अवघा कां गे ! तव लोपला
शुभहास्याची चमक दिसेना प्रसाद कां भंगला
अविरत अश्रूपूर वाहतीं दिससी कां व्याकुल
काय हरवलें कुणी पळविलें सांग तुझें मंगल
शून्यपणें अंतरालिं बघसी जडता जडली दिसे
सांग सांग तुज सांग लागलें दृष्टि ! कुणाचें पिसें
एकच ठायीं स्तब्धपणें कां ध्यान असें लावलें
विलासवैभव सकल विकलता कोणास्तव पावलें
सहजस्मितता मधुर तरलता लीलापरता कुठें
उदासीनता अशी अनुचिता सांग आज कां उठे
मधुर सुखद संगीत चाललें सृष्टीवर चहुंकडे
परी श्रवणहो ! तुम्ही जाहलां कोणास्तव वेडे
ध्यान कुणाचें भान हरपवी प्रसन्नता भंगवी
रसवंतीचें स्मरण कुणाच्या चित्तवृत्ति गुंगवी

( अपूर्ण

---

— पोपटपंची

## तव विरह विकल करि बाळा !

चाल—अजि अक्रुर.

किति काळ तुला इथुनी जाउनि झाला
ये त्वरित गड्या स्नेहाळा !
नच कांहि सुचे, रुचे न कांहिं मनाला
तव विरह विकल करि बाळा !
गुण विमल तुझे निशिदिनिं मनिं आठवती
करुं काय हृदय पिळवटती
तुज वांचुनिया निराधार जग वाटे
दुःस्थितिचे रुतती कांटे
हे असाति पुत्र बहु पोटीं
वेगळांच परि तव कोटी
बहुतांची कळालि कसोटी
मम जीवाचे पांग तुझ्याविण बाळा !
फेडिना कुणी वेल्हाळा !
त्या सर्वांच्या अविवेकी मति कळल्या
स्वार्थांत पुरोपुर मळल्या
ज्या त्यासि हवा गाजविण्या अधिकार
सेवेला सगळे चोर
मम प्रेम कुणा कुणास अंतरिं नाहीं
मानाचे सर्व शिपायी

पोपटपंची —

कुणि वेष, कुणी तों जाती,
कुणि धर्म, पंथ, कुणि व्यक्ती
अभिमान धरोनी लढती
परि दुःख कुठे काय होइ मातेला
हा विचार ये न कुणाला
निज देहातें चंदनसम झिजवूनी
संकटें विविध सोसूनी
जें कार्य तुवां श्रमुनि जमविलें बा रे
त्यावरुनी गेलें वारें !
दुर्दैव कसें मानगुटीवरि बसलें
घडलेलें बिघडुनि गेलें
दुःस्थिति ही सकल टळाया
बिघडलें पुनः घडवाया
परमेश कृपा मिळवुनिया
मज भारतिची पूस आसवें बाळा !
तो स्मरुनी पूर्व जिव्हाळा

—

—पोपटपंची

## प्रेमगंगा.

चाल—दो दिवसाची.

प्रेमळ दो जीवांचें मीलन होतें तरि तें होऊं द्या
एकतान हृदयांची वीणा भंगुं नका ती लहरूं द्या । ध्रु०
स्वरास्वरांचा सुरेल संगम प्रवाह मंगल वाहतसे
पवित्र गंगा ही प्रेमाची तींत कुणासहि पोहूं द्या
विजयध्वज प्रेमाचा फडके अनंत अंबरिं मुक्तपणें
प्रेमाकाशीं उडत्या विहगा रोधुं नका त्या विहरूं द्या
वृक्षवेलि बहरासी आल्या प्रेमफुलोरा विकासला
प्रसन्न मंगल सुगंध त्यांचा स्वैर चहुंभरी पसरूं द्या
शशिकर कुमुदिनि हसति परस्पर हासूं द्या त्यां तुम्ही हसा
प्रेमसुधेच्या सिंचनसमयीं दूर सरा तें चालूं द्या
कवळूं धांवे शशिसी सागर फेकुनि लाटांवरि लाटा
तळमळत्या त्यां जीवां जीवन लाभे तरि तें लाभूं द्या
विधिनियमांचे पाश आवरा, मार्गी कंटक पसरुं नका
प्रेमी हृदयां प्रेमरंगणीं रंगपंचमी खेळूं द्या

---

## कविते ! करिन तुला मी ठार.

राग—केदारा.

कविते ! करिन तुला मी ठार । ध्रु०

पूर्व कवींनीं तुज रस पाजुनि मस्त बनविलें फार
रस बिस आतां मम साम्राज्यीं कांहिं न तुज मिळणार
अलंकारमद—मत्त जहालिस धुंदि उतरतों पार
मोडुनि तोडुनि फेकुनि त्यांना दृष्टि न दिसुं देणार
पदोपदीं अवसानीं तुझिया करुनी घातक वार
सुवृत्त अथवा सुपदा कशि तूं हेंचि अतां बघणार
पदलालित्यें जना भुलविलें केले नाना चार
भावाची बहु हाव तुला परि अभाव तुज करणार
नादांतचि रंगुनी गुंगविसि रसिका करिसी गार
नाद तुझा तो नष्ट कराया समर्थ मी साचार
समृद्ध अर्थें असा मिरविला आजवरी बाडिवार
अर्थाचा परि लेश यापुढें तुजला नच मिळणार
कोशावरि तव भार सर्व परि लाविन त्याचें दार
शब्दांच्याचि न कृतिच्या दैन्यें मळविन तव संसार
व्याकरणाच्या अंकीं बसुनी शुद्ध म्हणविशी फार
ठार करुनि परि तया तुझ्यावर ओतिन अशुद्ध धार

— पोपटपंची

अपशब्दांचा असा तुझ्यावर करितों बघ भडिमार
जरी न मेलिस तरि मेल्यापरि होशिल मग बेजार
देश धर्म वा वीर विभूती तुज न अतां दिसणार
आतां वणवण घुबडासंगें करविन तव संचार
मजलागीं तूं कोण समजशी मी तों कवि कलदार
कलदारचि कां शाहीरांचा फर्स्टक्लास सरदार

—

# आतां मला न मामी.

चाल—गजल.

आनंदकंद ऐसी । आतां मला न मामी । ध्रु०

गेली निघूनि गेली
कैलासवासि झाली
सृष्टी गमे निकामी । आतां०

खाणें रुचे न गाणे
वाटे उदासवाणें
लागे न चित्त कामी । आतां०

खातां पितां न्हातां
माझ्याशिं गोड आतां
बोलेल कोण धामीं । आतां०

नेत्री खळे न पाणी
यावी कशी भरूनी
जागा तिची रिकामी । आतां०

मामासि झालि साठी
आहेहि पुत्र पोटीं
मातें परी न मामी । आतां०

होईल का रडूनी
घे शोक आवरूनी
कितिकांस नाहिं मामी । आतां०

— पोपटपंची

रामाप्रती नमामी

कृष्णासही नमामी

देवादिकों नमामी । आतां०

मातापित्यां नमामी

गुरुलाहि त्या नमामी

अंबेसही नमामी । आतां०

देशाप्रती नमामी

धर्मासही नमामी

सर्वांस यां नमामी । आतां०

इतुक्यांस ती नसावी

तुजलाच कां असावी

मोठीच तूं असामी । आतां०

---



५

## ' ढे '

च.ल-क्या मजा देते हैं यार.

हें कुठलें फुटलें पेव
        ही धाड कोठुनी आली । ध्रु०
जा कुणिहिकडे हे अमती
यांचीच सर्व जणुं वसती
मार्गात विखुरले दिसती
        मोकाट गुरें जणुं सुटलीं
मंदिरीं घरीं बाजारीं
मसणांत तुरुंगद्वारीं
जा कुठेंहि यांची फेरी
        चुकवितां बुद्धि बावरली
हा काय ईश्वरी कोप
कीं त्यास लागली झोप
पाहुनी हलुंच हें रोप
        उतरूनि पसरलें खालीं
मच्छरांसि मच्छरदाणी
रोगांवरि औषध पाणी
परि यांच्यावरती अजुनी
        कोणा न औषधी सुचली

— पोपटपंची

भय सहन आगिचें करवे
अतिवृष्टि भयंकर पुरवे
साथीसहि पुरुनी उरवे
        यापुढें शक्ति परि हरली
अभिषेक शिवाला करवा
जोगवा देविचा फिरवा
कुणिकडुनि पीक हें जिरवा
        शतवरुषें नातरि भरली
कथवति न छळांच्या रीती
वाटते पदोपदिं भीती
नच जाणति नीति अनीति
        सारीच दुष्टता भरली
दुष्ट तरी असतिच मोठे
त्यांहुनिही वरचढ छोटे
क्रूर चोर कपटी खोटे
        दुर्जनता पुरुनी उरली
संबंध कधींहि न यावा
ठेविती भयंकर दावा
घेतलाच हरहर ! चावा
        'ढे' ! पुढें शुद्धि नच उरली

———

पोपटपंची —

## ' शाहीर '

चाल-—उद्धवा शांतवन—

या महाराष्ट्र देशांत । उपजलों मीच शाहीर । ध्रु०
राष्ट्रांत नाद घुमवीला । जवळचि अतां उद्धार
यापुढतीं काव्यश्रीला । चढवीन नवा शृंगार
शब्दसंघ फुलविन हर्षे । स्वातंत्र्य तया मिळणार
हलवीन सर्व इतिहास
कांपवीन व्याकरणास
विश्रांति न संगीतास
मेलेले मुडदे म्हणती । उपजलों मीच शाहीर

शाहिरा कशाला विद्या । मळतसे काव्य विद्येनें
जसजसें वाढतें ज्ञान । तसतसें काव्य विलया ने
शाहिरें न म्हणुनि शिकावें । असावें मस्त अज्ञानें
अज्ञानवारुवरि स्वार
गर्वाची करिं तरवार
होउनिया बेदरकार
सर्वत्र गात सुटेन । उपजलों मीच शाहीर

कवि सर्व इतर ते कवड्या । मी मात्र एक ' कलदार '
कविता त्या म्यांच कराव्या । फिरवाव्या दारोदार
पडद्यांतिल कविता कसली । पाहिनाच जो बाजार
निर्लज्ज बनूनि फिरावें
दिसतांच जमाव शिरावें
अपुलेंच काव्य भरडावें
करुं शके कोण मजविण हें । उपजलों मीच शाहीर

— पोपटपंची

शाहिरें आपुलें काव्य । म्हण म्हणतां कधिं न म्हणावें
प्रेमें कुणि आग्रह करितां । त्याच्यावरि वसूकन् जावें
आपुल्याच मग इच्छेनें । भलतेंसें गात सुटावें
मग किटोत कान कुणाचे
काय होय अपणा त्याचें
हे वैभव शाहिरतेचें
हें वर्म जयाला पटलें । तो तोच होय शाहीर

रागांची पर्वा कोणा । तालाची वा दरकार
राग ताल दुसऱ्यासाठीं । मी न त्यांत सांपडणार
मी स्वयंभु शंभु वाटोळा । मी असें स्वैर शाहीर
मज हसतो रसिक नव्हे तो
कवितेंत तालसुर बघतो
अर्थ वा पाहण्या धजतो
काव्यांत अर्थ जो ठेवी । तो होय कुठुनि शाहीर

कोणतेंहि मासिक उघडा । मम दिसे त्यांत कवि–कर्म
मम अखंड काव्यस्राव । नच केवळ मासिक–धर्म
संपादकांस मज अथवा । हें ठावें सगळें वर्म
शाहिरपण माझें उघडें
हाडांचीं करुनी काडें
बाडांवरि लिहिलीं बाडें
यावरिहि कोण मजलागीं । म्हणणार नाहिं शाहीर ?

---

## स्वतंत्र हिंदुस्थान.

चाल—रण-गीताची.

स्वतंत्र हिंदुस्थान । स्वतंत्र हिंदुस्थान
स्वतंत्र हिंदुस्थान । गर्जे स्वतंत्र हिंदुस्थान । ध्रु०
स्वतंत्र हिंदुस्थान, कुणाच्या पुढें न लवविल मान
स्वतंत्र हिंदुस्थान, यापुढें साहिल नच अपमान
स्वतंत्र हिंदुस्थान, जाणतो एकचि मंत्र महान्
बंधु बंधु सारेच हिंदुजन, कोणि न थोर लहान
स्वतंत्र हिंदुस्थान हिंदुचा, हिंदुच तत्संतान
स्वतंत्र हिंदुस्थान, जगाला देइल धर्मज्ञान
स्वतंत्र हिंदुस्थान जगाचें अखंड सौख्यनिधान
स्वतंत्र हिंदुस्थान जगावरि पसरिल शांतिवितान

---

— पोपटपंची

## भारत-भाग्योदय.

चाल—गुरुनाथ निरंजनहो—

स्वातंत्र्य-देवतेचा गाउं या धन्यवाद
पर्वणी थोर आली गर्जवूं सिंहनाद । ध्रु०
उदयाद्रिवरी आला स्वातंत्र्यसूर्य आज
दुर्भाग्य-तिमिर गेलें प्रकटलें दिव्य तेज
उमलली महाराष्ट्रीं चैतन्यपुष्पशेज
हिंदु होय जागें निवटुनि सर्व भेद
सौभाग्यतिलक लावी हिंदभू आज भाळीं
स्वातंत्र्यमंदिराची स्वामिनी पूर्ण झाली
हिमधवल यशोध्वज तो फडकवी अंतराळीं
आजचा दिव्य महिमा वर्णितां थकति वेद
जीजाइ माउलीचा शिवराज बाळ तान्हा
अवतीर्ण आज झाला पाहुनी देश-दैना
इतिहास हासवीला जगविला धर्मराणा
कर्तृत्व खेळवीलें पळविला दैववाद
धर्मांध-दुर्जनांची जेधवां धाड आली
सर्वस्व हिंदभूचें घालुनि पशाखालीं
परकीय पुंड सत्ता सर्वत्र मस्त झाली
थैमान स्वैर घाली इस्लामि अर्ध चांद

पोपटपंची —

परकीय गुंड तेव्हां माजले पुष्ट पोळ
उत्पात चालवीले मांडिली जाळपोळ
दुष्टता पुष्ट झाली आणिली प्रलयवेळ
आक्रांत उठे सारा सर्वत्र आर्तनाद

चहुंकडे डोंब उठला यवनार्त देश झाला
अवरोध व्यर्थ गेला रक्तांत देश न्हाला
कोणा न सुचे कांहीं पातला घोर घाला
शास्ता दिसे न कोणी उतरील दुष्टमाद

दिवसासि राजमार्गी चरचरा चिरति गायी
आक्रोश कुलवधूंचा कार्णि ये ठायिं ठायीं
धन वित्त वपू अपुली आपुली उरलि नाही।
सत्ताच चोर बनली गांजण्या निरपराध

थांबलीं धर्मकर्मे मंदिरें ध्वस्त झालीं
श्रीरामनाम लपलें मशिदींत वाढ आली
जानवें शिखा गेलीं हनुवरी दाढि ठेली
हिंदुत्व मरूं पाहे ऐके न कोणि दाद

देशांत मोठमोठे नरमणी समरधीर
परि दास्यपंजरींचे ते सर्व बद्ध-कीर
त्या पारतंत्र्यहरणीं सहजची नष्ट-धीर
वाली न कोणि उरला संकटा घालि बांध

— पोपटपंची

स्वत्वास फास कंठीं सच्छील चोर ठरलें
चातुर्य धैर्य यांचें स्वजनांच शौर्य उरले
ज्ञान तो भाट बनुनी परतेत पूर्ण मुरले
आशा न दिसे कोठे पसरला दैववाद
त्राहि रे ! त्राहि भगवन्! करुणार्द्र देवदेवा !
ये दीन-वत्सला बा ! पेटला घोर वणवा
कैवारि कोणि नाहीं तुजवीण वासुदेवा
यापरी हिंदभूने फोडिला आर्त नाद
गुंफुनी प्रेमभक्ती-वैराग्यवैजयंती
गोपाळ आळवीला कारुण्यधाम संतीं
धावला धावण्याला कळवळुनि देव अंतीं
शिवराजसिंह रूपे परिहरी सर्व खेद
त्या घोर विषमकाळीं शिवमूर्ति प्रकट होई
कारुण्य श्रीहरींचे कळवळुनि काय येई
पुण्य वा हिंदभूचे शिवराज रूप घेई
शिवसूर्य उदधि येतां नैराश्य घे विषाद
शिवराज प्रकट होतां मूढता नष्ट झाली
स्वत्वास तेज चढलें जाहलें शक्तिशाली
जागल्या शक्ति युक्ती भक्ति त्या पुण्यकालीं
दुर्जनां काळ आला उतरला सर्व माद
ते वैरि हिंदभूचे रडविले धायिधायीं
चारिली धूळ चोरां कापिले आततायी
मस्तकें मस्तवाल ठेचिली ठायिंठायी
हिंदभू मुक्त केली घुमावला धन्यनाद

## निसर्गसंग्राम.

( 'संगम' काव्यांतील उतारा )

वृत्त-स्रग्धरा.

काळोख्या मध्यरात्रीं
चहुकडुनि नभीं मेघपंक्ती उठाव्या
गर्जाव्या घोर घोषें
शरनिकर तशा वारिधाराहि याव्या
मोदें सौदामिनीनें
कडकड करुनी तांडवा चालवावें
झंझावातें तयांना
सरसरुनि पुढें साह्य हर्षें करावें
साम्राज्यीं ह्या तमाच्या
उमजति न दिशा मार्ग कोठें दिसावा
अंधारें व्याप्त सारें
जगत गमत तैं अंतिचा घे विसावा
लोकीं होता प्रकाश
स्मृतिहि अशि जणों नष्ट संपूर्ण व्हावी
सृष्टीच्या भीष्मतेची
अवधि कुठवरी शुष्कशब्दीं वदावी ?
आतां आलोक कैचा
तिमिरहि कुठुनी यापुढें हें टळावें

— पोपटपंची

ऐशा नैराश्यडोहीं
जग सकल बुडे सर्व आशा दुरावे
तो तैशा कालरात्री-
मधिहि उगवल्या तारका दोन चार
त्यांच्या इषत्प्रकाशें
तिमिरवशजगा लाभला अल्प धीर
तारांच्या त्या प्रकाशें
नभिं घन चिडले त्यांप्रती गट्ट केलें
केला गर्जोनि हर्ष
प्रकट, जणुं करी स्वर्गिंचे राज्य आले
व्हावे निर्मूल शत्रू
म्हणुनि गगनही व्यापुनी टाकियेले
त्यांचें विद्युल्लतांनीं
विकट हसुनि तै कृत्य तें मान्य केले
गेले सारे लयाला
समजुनि रिपु ते मेघ जो स्वस्थ झालं
तो येवोनी दुजांनी
पुनरपि अपुले कार्य ते चालवीलें
ऐसा हा चालुं होतां
अविरत झगडा निर्बलांचा वलीशीं
गेलीं कित्येक मेलीं
कितिक अडकली निर्बले शत्रुपाशी

पोपटपंची —

केव्हां आशा निराशा

उदय लय कधीं पावुनि कांहिं काल

नेतें सिद्धीस कार्य

स्वबल बनविलें तारकांनीं विशाल

कोठें त्या क्षुद्र तारा,

घनबलसहिता रात्र कोठें कराला

तारांच्या संहतीनें

रजनि विरमुनी गर्व तीचा विराला

होतां ती हीनशक्ति

प्रथम विखुरल्या सर्वही मेघपंक्ती

वारा सारा स्थिरावे

चपलहि चपला जाहली नष्टदीप्ती

झालें दुष्टा तमाचें

मुख मलिन तदा स्थान पाहे लपाया

सद्दीचा काळ जातां

अमित बल तरी होतसे सर्व वाया

ऐश्वर्यातें निशेच्या

हळुंहळुं गळती लागुनी या प्रकारें

झाला तेजोनिधीचा

पथ सुगम जया व्यापिलें अंधकारें

झाली सारी तयारी

बघुनि मग निघे यावयातें तमारी

— पोपटपंची

तें व्हावें वृत्त लोकीं

प्रथित म्हणुनि ये पूर्वि संदेशहारी

दूतोक्ता पुण्यवार्ता

श्रवणिं परिसतां खिन्नता सृष्टि सोडी

धाडी देशीं निराशा

उदयमुखविधी देइ दुःखास गोडी

आहा ! तो सौख्यदायी

ध्वजपट विलसूं लागतां पूर्वभागीं

जागीं होऊनि गाती

द्विजविहगकुलें तद्यशा जागजागीं

हासे चैतन्य सारें

अवनिभरि करी सौख्य सर्वत्र वृष्टी

कष्टी कोणी दिसेना

विजयमदभरें वावरे तुष्टि पुष्टी

---

## तरुण भारतास !

चाल—नृपममता—

मुख करुनी केविलवाणें
    कां गाशि सदा रडगाणे । भारता
' मी दीन पंगु दुर्दैवी '
    कां भाषा वदनीं यावी ! । भारता
दुर्बलता मनिची ऐसी
    साजेना क्षणही तुजसी । भारता
भारता, धरीं वीरता, वीर तूं स्वतां
असुनि कां ऐशी
    दीनता वृथा ही वरिशी । भारता
आपुलेच मिटुनी डोळे
    म्हणतोस सर्व अंधार । भारता
कर्तृत्व सोडुनी सगळें
    दैवावरि घालिशि भार । भारता
एकाच ठायिं बैसूनी
    पंगुत्व कसें जाणार ? । भारता
हे कसें, जडे तुज पिसें, होत जगिं हंसें
लाज धरिं कांहीं
    हें दैन्य झुगारुनि देईं । भारता

— पोपटपंची

अंतर्मुख करुनी दृष्टी
कर्तृत्व पूर्वींचें पाहीं । भारता
ऐश्वर्य आपुले स्मर तें
ज्या जगांत तुलना नाहीं । भारता
करिं आत्मनिरीक्षण जेणें
हें दैन्य लयाला जाई । भारता
तव तेज, स्वयंभू सहज, प्रकटवी आज
संधि ही नामी
हो तूंच जगाचा स्वामी । भारता
हे विश्व–भुवन रमणीय
निर्मिलें तुझ्यास्तव देवें । भारता
त्यांत तूं हसावें गावें
त्यांतील सौख्य भोगावे । भारता
वसुधेच्या पाठीं पोटीं
नांदत्या श्रीस ओढावें । भारता
आदेश, करी हा ईश, पाळिं तूं त्यास
धन्य होशील
चल उठ हो उद्यमशील । भारता

—

# हिंदूसंघटन.

## ओव्या.

हिंदु तितुका मेळवावा । हिंदुधर्म वाढवावा
संसार अवघा भरावा । हिंदुमात्रें
हिंदु तितुका मेळवावा । शक्तियुक्तीने भरावा
जगी ध्वज फडकवावा । हिंदुत्वाचा
हिंदु तितुका मेळवावा । बंधुभावें आळवावा
लोकीं आदर वाढवावा । हिंदुनामीं
हिंदु हिंदूच असावा । सर्व जगीं विखुरावा
सारा हलकल्लोळ करावा । हिंदुपणें
हिंदु असावा संपन्न । हिंदु असावा बलवान
जगत नमवावें आदरून । हिंदुपुढे
हिंदु असावा कर्मयोगी । हिंदु असावा ज्ञानयोगी
हिंदु असावा सर्व भोगी । त्यागीहि तैसा
हिंदु असावा स्वतंत्र । हिंदु नसावा परतंत्र
परिस्थितीचें दारुण यंत्र । हिंदूनें फोडावें
स्वयें हिंदूच राहीन । दुजाहि हिंदूच पाहीन
प्रतिज्ञा की रक्तें न्हाईन । हिंदुत्वार्थ
काया वाचा आणि मनें । स्वयें वर्तूनि हिंदुपणें
भेदाचें भूत ओगळवाणें । टाकावे गाडुनी

वरिष्ठ–कनिष्ठादि भेद । हे तो नसती जन्मसिद्ध
त्यांचा करोनि उच्छेद । बंधुभावे असावे
वरिष्ठें कनिष्ठां संगोपावे । कनिष्ठे वरिष्ठां मानावे
परस्परकलह मोडावे । आत्मभावे
दुरावलेल्यां जवळावें । आपुला म्हणोनि कवळावें
त्याचे अंतर निवळावे । धर्मज्ञानें
जगास देईन हिंदुदीक्षा । ऐसी धरावी महत्त्वाकांक्षा
सारा संसार आपुल्या पक्षा । वळवावा हिंदुने
जो आपणा म्हणवी हिंदु । तो मानावा सख्खा बंधु
हिंदुत्वाचा विशाल सिंधु । मोकळा सर्वा
हिंदूधर्माचें दिव्यामृत । सर्वां पाजावे मनसोक्त
धर्मज्ञानाचा क्षुधित । उरोंचि नेदावा
प्रेम असावे सर्वां भूतीं । परि न त्यजावी तेजोवृत्ति
रक्षावी आपुली महती । परमादरें
हिंदुने मऊपण सोडावे । सदा तेजोगुणे वर्तावें
अपमानाहूनि मरण बरवे । वाटावे हिंदूसी
सदा करुनी उज्ज्वल कर्म । जगीं उजळावे 'हिंदु' नाम
प्राणप्रिय हिंदुधर्म । लोकीं वाढवावा

---

पोपटपंची —

## तो हिंदु कशाचा ?

### ओव्या.

नीचा उच्च करीना । चुकल्या मार्गीं लावीना
भ्रष्टल्या शुद्धि देना । तो हिंदु कशाचा

सुवर्ण करीना लोहास । त्या कैसे म्हणावे परीस
अस्पृश्यां करीना स्पृश्य । तो हिंदु कशाचा

हिंदूनीं राज्यें स्थापिलीं । साम्राज्यें विस्तारिली
ती महत्वाकांक्षा सोडिली । तो हिंदु कशाचा

सारें जगत् आक्रमिले । तेथें हिंदुत्व स्थापिलें
हें जरी विसरून गेलें । तो हिंदु कशाचा

कराया हिंदुत्व रक्षण । तळहातीं धरिले प्राण
त्या शिवाजीचें विस्मरण । तो हिंदु कशाचा

चहुंकडूनि हिदुत्वावर । बैसतां दिसे भडिमार
कांहींच करीना प्रतिकार । तो हिंदु कशाचा

हिंदु स्त्रिया विडंबितां । हिंदु मंदिरें विध्वंसितां
त्वेष न ये ज्याच्या चित्ता । तो हिंदु कशाचा

अपमानाची न ये चीड । परिस्थितीची धरी भीड
उदासीनतेची न काढी कीड । तो हिंदु कशाचा

जशास वागेना तैसा । ठोशास देईना ठोसा
न धरी आपुलाच भरंवसा । तो हिंदु कशाचा

जे जें हिंदुत्वा घातक । त्याचे फोडीना मस्तक
बघत बैसे टकमक । तो हिंदु कशाचा
हिंदु करीन सारें जग । ऐसी लागेना तगमग
उदरभरणींच लगबग । तो हिंदु कशाचा
हिंदूंचा हा हिंदुस्थान । परकी बैसले धनी होऊन
हे सुखें करी सहन । तो हिंदु कशाचा

---

## गीतेची आरती.

जय गीते ! जय गीते ! जय जय सुखसरिते !
कर्तव्योन्मुखकारिणि ! मंगलमयचरिते ! । ध्रु०
मोहनिशेच्या तिमिरीं शोकीं मति बुडली
धर्माधर्म कळेना भ्रांति मना पडली
स्वत्वाची स्मृति नुरली स्थिरता गडबडली
ऐशा विषमी माते ! धावुनि तूं आली । जय०
भगवंताची वाणी रूप तुझें जननी !
मोहनिशाचरमथिनी ! स्वधर्म–संजीविनी !
रमतो नर जो सदये ! अखंड तव मननीं
कर्मे करुनिहि होतो समर्थ भवहननीं । जय०

पोपटपंची—

झालें ज्ञान तरीही कर्मी रत असणे
वृथाच नैष्कर्म्याच्या मोहीं नच फसणें
जनतासंग्रह कोणी ज्ञान्याविण करणे
ऐसीं बोधिसि देवी ! रहस्यमय वचनें । जय०

याच रहस्यें हरिलें पार्थाचे तिमिर
कर्तव्यीं त्या योजुनि करवियले समर
ते तव रहस्य गीते ! ' तिलक ' कर्मवीर
जाणुनि कळवी जगता शद्वी गंभीर । जय०

होवो कर्मरवीचा उदय जगद्गगनीं
नैष्कर्म्याचे घनतम जावो वितळोनी
कर्तव्याच्या पंथें निर्भय चालोनी
पूर्वैश्वर्या लाभो हिंदभूमि-जननी । जय०

—श्रीसीतारामचंद्रचरणार्पणमस्तु—